**मोटार वाहन विभागात (परिवहन कार्यालयात) सुरु केलेल्या कॉलसेंटरला व त्यामधील कार्यरत कर्मचा-यांच्या सेवेस मुदतवाढ देणे व त्यासाठीच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०१८

**वाचा :**

१) शासन ज्ञापन क्रमांक - एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४,दि.२७.०४.२०१७
२) शासन ज्ञापन क्रमांक - एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४, दि.०७.०८.२०१७
३) शासन ज्ञापन क्रमांक - एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४, दि.१२.०९.२०१७
४) शासन निर्णय क्रमांक -एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४, दि.२५.०१.२०१८
५) शासन निर्णय क्रमांक -एमव्हीडी-०११७/प्र.क्र.१२/परि-४, दि.२८.०५.२०१८
६) परिवहन आयुक्त,मुंबई यांचे पत्र क्र- पआका/का.११/संगणक/Veenus/कॉलसेंटर-मुदतवाढ/२०१८/जा.क्र.८६७४, दि. १५.०६.२०१८

**प्रस्तावना :**

राज्यातील परिवहन कार्यालयाकडे प्राप्त होणारे अर्ज परिपूर्ण असण्याकरिता नागरिकांना/ऑनलाईन अर्ज भरताना येणा-या अडचणींचे निरसन होण्याकरिता व योग्यवेळी सर्व माहिती अर्जदारास मिळण्याकरिता परिवहन कार्यालयात कॉलसेंटरची स्थापना करणे, कॉलसेंटर वर अनुज्ञप्ती नोंदणी/परवाना शुल्क इत्यादी सर्व माहिती देण्याकरिता संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२७.०४.२०१७ च्या शासन ज्ञापनान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आली होती. तसेच सदर कॉल सेंटर साठी संदर्भाधीन क्र.२ येथील दि.०७.०८.२०१७ च्या ज्ञापनान्वये एकूण ६ कर्मचा-यांची नियुक्ती मे. व्हीनस कन्सल्टन्सी यांच्यामार्फत करण्यास प्रशासकीय व वित्तीय मंजूरी दिली होती. संदर्भाधीन क्र.३ वरील दि.१२.०९.२०१७ च्या ज्ञापनान्वये कॉल सेंटरकरिता आवश्यक कर्मचारी नियुक्त करण्याचे अधिकार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांना प्रदान केले होते. सदर कॉल सेंटरला संदर्भाधीन क्र.५ येथील दि.२८.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०४.२०१८ ते दि.३१.०५.२०१८ पर्यंत मुदतवाढ व सदर कॉलसेंटरवर कार्यरत असलेल्या ६ कर्मचा-यांच्या सेवेस मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर मुदत दि.३१.०५.२०१८ रोजी संपलेली असून सदर कॉलसेंटरला पुढे मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

माहिती व तंत्रज्ञान विभागाने मान्यता दिल्यानुसार संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२७.०४.२०१७ च्या शासन ज्ञापनान्वये स्थापित केलेल्या कॉलसेंटरला दि.०१.०६.२०१८ ते दि.३१.०८.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास आणि कॉलसेंटरसाठी कार्यरत असलेल्या ६ कर्मचा-यांच्या सेवेस मुदतवाढ देण्यात येत आहे.

तसेच, सदर कर्मचा-यांस प्रति व्यक्ती प्रतिमहा रु.२९,५००/-+१८% जीएसटी याप्रमाणे ६ कर्मचा-यांकरिता रु.६,२६,५८०/- इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे. प्रस्तूत मुदतवाढ दि.३१.०८.२०१८ रोजी आपोआप संपुष्टात येईल.

२. यासाठी येणारा खर्च हा "मागणी क्र. बी-३, लेखाशीर्ष २०४१, वाहनांवरील कर-००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त आस्थापना योजनेत्तर दत्तमत (२०४१ ००१८), १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय माहिती व तंत्रज्ञान विभागाने दि.२३.०७.२०१८ रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ अ) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१२४७०५१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df749270342 8e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.08.02 12:49:05 +05'30'

(द.ह.कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव (माहिती व तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
१०.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती (परिवहन-४).